कारागृहातील बंदी शिस्तीने, सहकार्याने व लोकशाही पध्दतीने राहण्यासाठी बंदी पंचायत राबविणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
गृह विभाग
शासन परिपत्रक क्र. एमआयएस-२००३/१८४९/प्र.क्र.२२९/पीआरएस-२
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दि. १६ जानेवारी, २००४.

**शासन परिपत्रक** :- कारागृहातील सर्व बंदी शिस्तीने, सहकार्याने व एकीने रहावेत त्यांच्यामध्ये जबाबदारीची जाणीव निर्माण होवून लोकशाहीची भावना वाढीस लागावी व त्याद्वारे कारागृह प्रशासनात सुधारणा वाढ व्हावी या दृष्टीने बंदी पंचायत राबविणेबाबत कारागृह नियमावलीत त्याची तरतूद केलेली आहे. तथापि त्याची प्रभावीपणे अंमलबजावणी होत नसल्याने कारागृहाने बंद्यांना त्यांचे विचार किंवा तक्रारी मांडता येवून लोकशाहीची संकल्पना वाढीस लागणे जरुरीचे व गरजेचे असल्याचा विचार दि. २९ नोव्हेंबर, २००३ रोजी झालेल्या केंद्रपुरस्कृत कारागृह सुधारणा योजनेच्या आढावा बैठकीत मांडण्यात येवून कारागृह प्रशासन पारदर्शक करण्याच्या दृष्टीने चर्चा झाली. त्यानुषंगाने या परिपत्रकाद्वारे सर्व कारागृह अधिक्षकांना खालीलप्रमाणे अंमलबजावणी करण्याच्या सूचना देण्यात येत आहेत.

१) प्रत्येक कारागृहात स्वतंत्र बंदी पंचायत समिती/मंडळ असावे.

२) या समितीमध्ये प्रत्येक बरॅकीतील एक बंदी सदस्य असावा.

३) या समितीमध्ये दोन प्रतिनिधी त्या जिल्ह्यातील सामाजिक सेवाभावी संस्थेचे असावेत. त्यामध्ये एक प्रतिनिधी महिला असावी. हे प्रतिनिधी सामाजिक बांधिलकीची जाणीव असणारे स्वच्छ चारित्र्याचे व अशा कामाची आवड असणारे असावेत.

४) या समितीच्या बैठका महिन्यातून २ वेळा घेण्यात याव्यात.

५) या समितीचे अध्यक्ष हे त्या कारागृहाचे अधिक्षक असतील व एक वरीष्ठ तुरुंग अधिकारी तसेच जिथे उपलब्ध असल्यास, कारागृहाचे वैद्यकीय अधिकारी, शिक्षक हे शासकीय सदस्य असतील.

६) कारागृहातील जास्तीत जास्त बंद्यांना या समितीमध्ये काम करता यावे त्यादृष्टीने बंदी प्रतिनिधी दर महिन्याला बदलण्यात यावेत.

७) बंद्यांना त्यांचे प्रतिनिधी ठरविण्याचा अधिकार राहील, मात्र त्यांची कारागृहातील वर्तणूक चांगली असावी, त्यांना अशा कामाची जाणीव व त्यांचा हेतू शुध्द असावा.

८) बंद्यांना मिळणाऱ्या सोयीसुविधा व इतर तक्रारी किंवा प्रश्नांना न्याय मिळावा या हेतूने प्रत्येक बरॅक किंवा वॉर्डमध्ये तक्रार/सूचना पेटी ठेवावी.

९) या समितीच्या नियमित होणाऱ्या बैठकीमध्ये तक्रार/सूचना पेटीतील तक्रारीवर/प्रश्नांवर चर्चा होऊन त्याचे निराकरण व्हावे. तक्रार कोणी केली याचा उल्लेख टाळण्यासाठी तक्रारीवर तक्रारदाराचे नांव लिहण्यात येऊ नये. अशा सूचना कारागृह अधिक्षकांनी सर्व बंद्यांना द्याव्यात व तक्रार पेटीवर या सूचना लिहाव्यात. याबाबतची सर्व जबाबदारी संबंधित अधिक्षकांची राहील.

१०) समितीच्या बैठकीमध्ये वरील मुद्यांव्यतिरिक्त कारागृहातील, स्वच्छता, वैद्यकीय सुविधा/उपचार, आहार, कारागृहाची शिस्त, कारागृह प्रशासनाला मदत, सांस्कृतिक कार्यक्रम, शिबीरे, प्रशिक्षण इत्यादी बाबीवर चर्चा होऊन कारागृहाचे वातावरण एकोप्याचे व खेळीमेळीचे राहील यावर कटाक्ष असावा.

११) या समितीच्या बैठका नियमितपणे होतील याची जबाबदारी संबंधित विभागाच्या उपकारागृह महानिरीक्षकांची राहील. तसेच महिन्यातून किमान एकदा एका कारागृहाच्या बैठकीस त्यांनी हजर राहून मार्गदर्शन करणे आवश्यक आहे.

१२) समितीच्या बैठकीसाठी स्वतंत्र रजिस्टर ठेवण्यात यावे व त्यामध्ये बैठकीत झालेल्या कामकाजाची नोंद करण्यात यावी त्यावर सर्व समितीच्या सदस्यांची स्वाक्षरी असावी.

१३) संबंधित कारागृहाच्या भेटीच्या वेळी कारागृह उपमहानिरीक्षक/कारागृह महानिरीक्षक/राज्यस्तरावरील अधिकारी यांनी सदर समितीच्या बैठक रजिस्टरची पाहणी व त्यांची तपासणी करुन त्याबाबतचे अभिप्राय, सूचना, मार्गदर्शन इत्यादी बाबतच्या नोंदी रजिस्टरमध्ये दर्शवाव्यात.

कारागृहामध्ये लोकशाही संकल्पना राबवून कारागृहातील बंद्यांचे जास्तीत जास्त प्रश्न कसे सोडविता येतील तसेच कारागृह प्रशासनात पारदर्शकता येवून बंद्यांमध्ये शिस्त सहकार्य, जबाबदारी व एकी कशी निर्माण होईल यादृष्टीने कारागृह अधिक्षकांनी वरील सूचनांची कारागृह नियमावलीतील तरतूदीच्या अनुषंगाने प्रभावीपणे अंमलबजावणी करण्यात यावी. सर्व कारागृह उपमहानिरीक्षक व कारागृह महानिरीक्षक, पुणे यांनी याबाबत सर्व संबंधितांना सूचना देऊन याच्या अंमलबजावणीबाबत कार्यवाही करावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

(र. ना. माळी)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन, गृह विभाग

प्रति,

1 • मा. राज्यपाल यांचे सचिव
1 • मा. मुख्यमंत्री यांचे सचिव
1 • मा. उपमुख्यमंत्री यांचे उपसचिव
1 • मा. मंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव
1 • मा. राज्यमंत्री (गृह/तुरुंग) यांचे खाजगी सचिव
1 • मा. मुख्य सचिव
1 • अपर मुख्य सचिव (गृह), मंत्रालय, मुंबई-३२
1 • प्रधान सचिव (तुरुंग), मंत्रालय, मुंबई-३२
2 • महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२ (२ प्रतीत प्रसिध्दीकरीता)
6 • सर्व विभागीय आयुक्त — 6
1 • पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
8 • सर्व पोलीस आयुक्त — 8
1 • विशेष पोलीस महासंचालक व कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
30 • सर्व जिल्हाधिकारी 30
1 • उपसचिव (तुरुंग), मंत्रालय, मुंबई-३२
5 • सर्व कारागृह उपमहानिरीक्षक 35
35 • सर्व कारागृह अधिक्षक (मध्यवर्ती/वर्ग-१/वर्ग-२)
1 • प्राचार्य, बोस्टन स्कुल, नाशिक
1 • अवर सचिव (का. पीआरएस-१/3), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
• निवडनस्ती, कार्यासन-पीआरएस-२

गृह विभाग
निर्गमित केले
दिनांक ..12/05..
संख्या ..200प्र..